सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती २०२५/प्र.क्र.३४/शिक्षण-२**
मोती महल,२ रा मजला १९५,जे.टाटा रोड,
चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक - १९ जून, २०२५

**संदर्भ** :- १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५.
२) संचालक,इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र . क्र. इ.मा.ब.क.सं./ शिक्षण/मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती निधी मागणी/ २०२५-२६/पुणे, दि.०४.०६.२०२५

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दि. ०७ एप्रिल,२०२५ च्या परिपत्रकान्वये वित्त विभागाने वित्तीय वर्ष २०२५-२६ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर ) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत केला जाणार आहे. प्रत्यक्षात २४ % च्या मर्यादेत निधी उपलब्ध करून दिला आहे. सदर निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेंतर्गत योजनानिहाय वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०७ एप्रिल,२०२५ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती योजनेकरिता अर्थसंकल्पीत केलेली एकुण तरतूद रू. ५५,२५,९९,००० /- (अक्षरी रक्कम रूपये पंचावन्न कोटी पंचवीस लक्ष नव्यान्नव हजार फक्त) पैकी बीम्स प्रणालीवर उपलब्ध २४ % निधी म्हणजे रू. १३,२६,२३,७६०/- (अक्षरी रक्कम रूपये तेरा कोटी सव्वीस लक्ष तेवीस हजार सातशे साठ फक्त) इतकी रक्कम खालील नमूद लेखाशिर्षानिहाय संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.हजारात)

| अ.क्र | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | बिम्स प्रणालीवर उपलब्ध निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | माध्यमिक शाळांमध्ये शिकणा-या विजाभज आणि विमाप्र प्रवर्गातील ५ वी ते १० वी च्या विदयार्थ्यांसाठी गुणवत्तापूर्व शिष्यवृत्ती विद्यार्थी (**केवळ मुंबई विभागासाठी**) | २२२५ E ८९३ | १६० | ३८.४०० | ३८.४०० |
| २ | सैनिक शाळेत प्रशिक्षण घेणाऱ्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांसाठी निर्वाह भत्ता योजना | २२२५ E९२८ | ३०००० | ७२०० | ७२०० |
| ३ | इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ E९८२ | १५०००० | ३६००० | ३६००० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | इयत्ता ५ वी ते ७ वी मध्ये शिकणाऱ्या इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ F २४५ | १५०००० | ३६००० | ३६००० |
| ५ | इयत्ता ८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थीनींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती | २२२५ F २७२ | १५०००० | ३६००० | ३६००० |
| ६ | अ) माध्यमिक शाळांमध्ये शिकणाऱ्या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील ५ वी ते १० वी च्या विद्यार्थ्यांसाठी गुणवत्तापूर्व शिष्यवृत्ती (जिल्हा परिषद)<br>ब) इ. ५ वी ते ७ वी मध्ये श्किणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील मुलींकरिता सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती<br>क)माध्यमिक शाळांमध्ये शिकणा-या विजाभज व विमाप्र प्रवर्गातील विदयार्थ्यांसाठी शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क प्रदान करणे. | २२२५ F०११ | ७२४३९ | १७३८५.३६० | १७३८५.३६० |
| **एकूण** | | | **५५२५९९.०००** | **१३२६२३.७६०** | **१३२६२३.७६०** |

२. सदरहू योजनांकरीता संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण जिल्हा कार्यालय हे आहरण व संवितरण अधिकारी असतील मात्र, केवळ मुंबई शहर व मुंबई उपनगर या दोन्ही जिल्ह्यांकरिता जिल्हा परिषद नसल्यामुळे बृहन्मुंबई करिता समाज कल्याण अधिकारी, बृहन्मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. तसेच संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय,पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याबाबतचे खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च / लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळेवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळेवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करून निधी वितरीत करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०७ एप्रिल,२०२५ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१९१५५२५८७५३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH SHRIDHAR DHAWLE

Digitally signed by PRAKASH SHRIDHAR DHAWLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=eadb2369514cf114fb080a75acc2ae8dcf8591b733bb6f63612246049721dfca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60C3A22DD966735D3A1B24AA927CFEE6BED87B4A378083D720DF90D57B2125D8, cn=PRAKASH SHRIDHAR DHAWLE
Date: 2025.06.19 15:53:40 +05'30'

**( डॉ.प्रकाश धावले)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. मा. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. सर्व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण ( प्रादेशिक ) विभाग.
७. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
८. समाज कल्याण अधिकारी, समाजकल्याण विभाग,बृहन्मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती ( शिक्षण -२)